**उमरीनाला मध्यम प्रकल्प ता. सावनेर, जि.नागपूर खापा लघु कालवा सा.क्र. ० ते ६००० मी. वरील मातीकाम व बांधकामाचा विशेष दुरुस्ती व पुन:स्थापनेच्या कामाचा प्रशासकीय मान्यतेकरीता प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमा-२०१७/(प्र.क्र.३१५/२०१७)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : १३/०३/२०२०

**वाचा:-** १. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र.गोमपाविम/सिंचन-१/धा.क्र.१९,३०/७५३८, दि. १६/०८/२०१८.
२. शासन निर्णय-२०१७/५६६/१७/सिंव्य (कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय-संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६/०५/२०१७.

**प्रस्तावना:-**

उमरी मध्यम प्रकल्प हा ता. सावनेर जि.नागपूर येथे उमरी गावाजवळील उमरी नाल्यावर असून नागपूर-सावनेर-पांढुर्णा या राष्ट्रीय महामार्गावर असून उमरी गावाच्या उत्तरेस आहे. सदर प्रकल्पाचे स्थळ मानचिन्हावरील रेखांश २१ २५ ४५ अक्षांश ७८ ४७ ४० वर आहे. या प्रकल्पास मुळ प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक युएमआर/ १०६४/६९३६४-आय (२) दि. १८/०१/१९६६ अन्वये रु. ४१.६६ लक्ष किंमतीस मान्यता प्राप्त झाली. सदर प्रकल्पाचे घळ भरणीचे काम सन १९७१ मध्ये पूर्ण झाले सन १९७१-७२ पासून प्रत्यक्ष सिंचनास सुरुवात झालेली असून हा प्रकल्प सिंचन व्यवस्था व्यवस्थापनास सन १९७१-७२ मध्ये हस्तांतरीत करण्यात आला. प्रकल्पाचे धरणाची लांबी ४८५ मी. असून सांडव्याची लांबी ९० मी. आहे. प्रकल्पाचा एकूण जलसाठा ५.७७६ दलघमी असून उपयुक्त जलसाठा ५.१४२ दलघमी आहे. प्रकल्पास १मुख्य कालवा असून त्याची लांबी ८.२ कि.मी. व ४ लघु कालवे असून त्याची एकूण लांबी ८४१० मी. आहे. त्यांची विसर्ग क्षमता अनुक्रमे १.०६ घमी/सेकंद ते ०.०७ घ.मी./सेकंद इतकी आहे. प्रकल्पाचे एकूण समादेश क्षेत्र २४६९ हेक्टर लागवडी योग्य क्षेत्र १९०२ हेक्टर व सिंचन क्षेत्र ९६३ असून सिंचन क्षमता ११८५ हेक्टर आहे. प्रकल्पीय अहवालानुसार खरीप व रब्बी हंगामात सिंचन करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुषंगाने सद्य:स्थितीत या प्रकल्पावर सरासरी ८८५ हेक्टर क्षेत्रास सिंचन करण्यात येत आहे. खापा लघु कालवा हा पहाडालगत गेलेला असून कालवा कंटुर (Contour) कालवा आहे. मागील ५-६ वर्षापासून निधी अभावी कालव्याचे काम झालेली नाही. कालव्याची वितरण प्रणाली मातीमधील (B.C.Soil) असून काही भागात कालवा भराव भागातून गेलेला आहे. त्यामुळे त्या भागात कालवा सतत पाझरत असतो. कालवा वितरण प्रणालीचे कामास ४५ वर्षाचा कालावधी झाल्यामुळे त्यावरील बांधकामाची तुटफुट झालेली आहे. कालवा पहाडा लगत असल्यामुळे दरवर्षी पावसाळ्यात पहाडावरील पाणी कालव्यात येऊन गाळ साचतो व भराव भागातून कालवा फुटतो. सिंचनाच्या दृष्टीने काही प्रमाणात डागडुजी करुन सिंचन केल्या जाते. इत्यादी कारणामुळे कालव्याचा विसर्ग कमी होऊन पुच्छ भागापर्यंत पाणी पोहचु शकत

नाही. त्यामुळे पंढरी व जलालखेडा येथील शेतकरी दरवर्षी सिंचनापासून वंचित आहेत. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या अनुषंगाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उमरीनाला मध्यम प्रकल्प तालुका सावनेर, जि.नागपूर खापा लघु कालवा सा.क्र. ० ते ६००० मी. वरील मातीकाम व बांधकामाचा विशेष कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु. ६६,०७,१८६/-, ३% अनुषंगिक व १ % वर्कचार्ज एस्टॅब्लीशमेंट खर्च रु. १,५७,०४९/-, अशा एकूण रु. ६७,६४,२३५/- (रु.सदुषष्ठ लक्ष, चौसष्ठ हजार,दोनशे पस्तीस फक्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या आधिकारान्वये व आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य.(कामे), दि.०१/०१/२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन पत्र दि. ०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्ये आर्थिक निकष मा.राज्यपाल यांच्या निर्देशानुसार विहित मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारीत तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अतंरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

५. पाणी वापर संस्थाना विश्वासात घेऊनच आवश्यक तरतूद करणे. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्योपूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

६. मातीकामे व गवत झाडे /झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

७. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

८. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातुन प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा. सदरची कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादरा करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.,

९. विषयांकित प्रमा अंदाजपत्रकातील तरतूदी ,दर, वहनअंतर, संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

१०. सदर प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी, वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.तसेच प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेची मंजुरी दिल्यानंतर पुन्हा सुधारित प्रशासकीय मान्यता देता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

११. उमरीनाला मध्यम प्रकल्प ता. सावनेर, जि.नागपूर खापा लघु कालवा सा.क्र. ० ते ६००० मी. वरील मातीकाम व बांधकामाचे दुरुस्तीचे काम पूर्ण करुन १५९ हे. सिंचन क्षेत्र पुनः स्थापित होणार आहे, याबाबतची संपूर्ण जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

१२. सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरित करणेची संपूर्ण जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

१३. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाकडील विशेष दुरुस्ती विस्तार व सुधारणांतर्गत प्रगतीपथावरील कामांचे प्रलंबित दायित्व हे सद्यस्थितीत अडीच पटीच्या मर्यादेतील वर्क प्लॅनपेक्षा जास्त झालेले असून, महामंडळाला वार्षिक नियतव्ययात अतिरिक्त निधी उपलब्ध झाल्यानंतरच सदर काम हाती घेण्याची संपूर्ण जबाबदारी कार्यकारी संचालकांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती ११ (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ जे १५८) या लेखाशिर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि. २६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रु. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही सन २०१९-२० मध्ये अ.क्र. ३२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र.२०२००३१३१३०६५८०२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rohit Ramesh Pol

Digitally signed by Rohit Ramesh Pol
DN: CN = Rohit Ramesh Pol, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2020.03.13 13:12:26 +05'30'

( रो.र.पोळ )
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.

२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन,मुंबई.
५. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद,विधानभवन,मुंबई.
६. मा.विरोधीपक्षनेते,विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई.
७. मा.विरोधीपक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई.
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. मा.राज्यमंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०.प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
११.सचिव ( जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३.महालेखापाल-२ १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर.
१५.मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, नागपूर.
१६.आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
१७.अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर.
१८. कार्यकारी अभियंता,नागपूर पाटबंधारे विभाग, उत्तर (नागपूर).
१९.सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१७/(प्र.क्र. ३१५/२०१७)/सिं.व्य. (कामे),**
**दि. १३/०३/२०२० चे सहपत्र**

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | तपशिल | रक्कम रु.लक्ष |
|---|---|---|
| १ | मातीकाम | २५,४६,३६४ |
| २ | बांधकाम पुन:स्थापना | |
| | अ) प्रोफाइल वॉल्स | २,२२,६७७ |
| | ब) विमाचकांचे बांधकाम (९) | ५,२६,९५२ |
| | क) व्हि.आर.बी.चे बांधकाम (३) | ५,१०,२७४ |
| | ड) ह्युम पईप कलव्हर्ट | १९,३३,९९७ |
| | एकूण | ६६,००७,१८६ |
| | ३% संकीर्ण व १ टक्का वर्कचार्ज एस्टॅब्लीशमेंट | १,५७,०४९ |
| | एकूण प्रस्तावाची किंमत | ६७,६४,२३५ |

Rohit Ramesh Pol
Digitally signed by Rohit Ramesh Pol
DN: CN = Rohit Ramesh Pol, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2020.03.13 13:12:49 +05'30'

**( रो.र.पोळ )**
**शासनाचे अवर सचिव**